जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास, उपकामांस लेखाशीर्ष २५१५ ००५३ अंतर्गत व निवासी इमारतीच्या बांधकामासाठी लेखाशीर्ष २५१५ १२५६ अंतर्गत निधी जिल्हा परिषदा/पंचायत समितींना वितरीत करण्यासाठी LRS (Liability Register System) प्रणाली राबविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः** योजना-२०१९/प्र.क्र.१३६/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५,मर्झबान पथ
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-४००००१
**तारीख :** १८ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :**

**ग्राम विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः** विकास-२०१७/प्र.क्र.२७२/योजना-६ दिनांक ३१ मार्च, २०१८.

**प्रस्तावना :**

राज्य शासनामार्फत जिल्हा परिषदांना विविध योजनांसाठी निधी वितरीत केला जातो. त्यानुषंगाने शासन स्तरावरून दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार कामांच्या निविदा मागवून कंत्राटदारांना कार्यारंभ आदेश दिला जातो. मंजूर कामांना तांत्रिक मान्यता प्राप्त करणे, निविदांना मिळणारा प्रतिसाद व इतर तांत्रिक बाबींमुळे काम पूर्ण होण्यास अधिक कालावधी लागत असल्याने जिल्हा परिषदेकडे निधी अखर्चित राहतो. परिणामी राज्याच्या एकत्रित निधीतून जिल्हा परिषदांकडे अशा प्रकारे हस्तांतरित किंवा अभिकरण तत्वावर दिलेल्या योजनांचा निधी हा बँक खात्यामध्ये पडून राहतो. कित्येकदा दोन आर्थिक वर्षातही निधी खर्च न झाल्याने पुढील आर्थिक वर्षात अखर्चित निधी खर्च करण्याची परवानगी मिळण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव प्राप्त होत असतात. असेही निदर्शनास आले आहे की, काही जिल्हा परिषदांमध्ये निधी खर्च न होता अखर्चित राहतो व त्याचवेळी इतर जिल्हा परिषदेकडील त्याच लेखाशीर्षाखालील योजनेची देयके निधी अभावी प्रलंबित असतात. प्रत्येक वेळी पूर्वी वितरीत केलेला निधी खर्चित झाल्याची खात्री पटवण्यासाठी उपयोगिता प्रमाणपत्राची मागणी करावी लागते. तसेच एखाद्या प्रकल्पाची सद्यस्थिती काय आहे किंवा एखाद्या टप्प्यावर एखाद्या योजनेचे शासनावर किती दायित्व (Liability) आहे, याची खातरजमा करण्यासाठी वेळोवेळी प्रत्येक जिल्हा परिषदेकडून माहिती संकलित करावी लागते.

०२. या सर्व प्रशासकीय अडचणी, त्रुटी व अकार्यक्षमता दूर करण्यासाठी व केंद्र व राज्य शासनाच्या धोरणानुसार, शासकीय कार्यालयातील सर्व आर्थिक व्यवहार रोखरहीत, धनादेशरहीत व डिजीटल पध्दतीने करण्याविषयी आदेश असल्यामुळे, ग्राम विकास विभागाने LRS (Liability Register System) ही संगणक प्रणाली ICICI बँकेच्या सहयोगाने विकसित करून राबविण्याबाबत उक्त वाचा मधील दिनांक ३१ मार्च, २०१८ च्या परिपत्रकान्वये, ग्राम विकास विभागातील सर्व योजनांना निधी वितरणासाठी सदर प्रणाली लागू करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. सबब, जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत व उपकामांसाठी तसेच निवासी इमारतीच्या बांधकामास निधी वितरीत करण्यासाठी LRS (Liability Register System) ही संगणक प्रणाली सुरू करण्याबाबत पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहे.

**<u>शासन परिपत्रक</u>:-**

जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास, उपकामास व निवासी इमारतीच्या बांधकामासाठी लेखाशीर्ष २५१५ ००५३ व २५१५ १२५६ अंतर्गत निधी वितरणासाठी LRS ही संगणक प्रणाली सुरू करण्यात येत आहे. सदर योजनेसाठी ग्राम विकास विभागामार्फत सदर दोन लेखाशीर्षांतर्गत निधी आहरित करण्यासाठी ICICI बँकेमध्ये दोन स्वतंत्र खाती उघडण्यात येतील. सदर योजनेंतर्गत आवश्यकतेनुसार शासन स्तरावरून अधिदान व लेखा कार्यालयातून निधी आहरित करून या खात्यांमध्ये ठेवण्यात येईल. ही प्रणाली थेट प्रदानाकरिता ICICI बँकेमार्फत राबविण्यात येईल. ICICI बँकेस देयके प्रदानाकरीता आदेश दिल्यानंतर बँकेने T+३ या कालावधीत लाभार्थ्यांच्या/कंत्राटदाराच्या थेट खात्यात निधीचे प्रदान करणे आवश्यक राहील.

०२. सदर LRS (Liability Register System) ही संगणकाधारीत वेबबेस्ड प्रणाली राहील. यामध्ये जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास, उपकामांस व निवासी इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देऊन, त्यानुसार शासनाकडून देण्यात येणारे अनुदान LRS प्रणालीवर नोंदविले जाईल. प्रशासकीय मान्यता प्रदान झाल्यानंतर जिल्हा परिषद/पंचायत समिती स्तरावर निविदा प्रक्रिया पार पाडण्यात येईल. तसेच निवडण्यात आलेल्या निविदा धारकाची माहिती संबंधित कार्यान्वयन अधिकारी LRS प्रणालीवर भरेल. यामध्ये बँक खाते क्रमांक, IFS CODE इत्यादीचा समावेश राहील. ही माहिती भरल्यानंतर प्रणाली एक संगणक निर्मित संकेतांक (Computer Generated Code) LRS कोड निर्माण करेल. हा सांकेतांक नमुद केल्याशिवाय कोणताही कार्यारंभ आदेश देता येणार नाही.

०३. यानंतर, जिल्हा परिषदेच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार कार्यारंभ आदेश देण्यात येतील व कामाच्या प्रगतीनुसार प्रचलित कार्यपद्धतीनुसार बील/देयके मंजूर करण्यात येईल. ज्यावेळी देयक पारित होईल त्यावेळी आहरण व संवितरण अधिकारी उदा. कार्यकारी अभियंता त्या प्रणालीत प्रत्यक्ष प्रदानासाठी मान्य रक्कम वजातीसह नोंदवेल. नियमित कार्यालयीन पद्धतीप्रमाणे प्रत्यक्ष देयक मुख्य

लेखा व वित्त अधिकारी यांच्याकडे जाईल. मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी देयक पारित केल्यानंतर प्रणालीवरील देयकाची रक्कम व प्रत्यक्ष देयकावरील रक्कम वजातीसह तपासून देयक पारित करेल व आहरण व संवितरण अधिकाऱ्याने मान्य केलेली रक्कम प्रणालीवर पारित करेल.

**०४.** सर्व जिल्हा परिषदांना पारीत केलेली रक्कम, सदर प्रणालीव्दारे ग्राम विकास विभाग स्तरावरील नियंत्रक अधिकारी यांना दिसेल. त्यानुसार, एकत्रित रक्कम ICICI बँकेमधील बचत खात्यातून काढून ती रक्कम ICICI बँकेच्या चालू खात्यात वर्ग केली जाईल. मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी पारीत केलेल्या व आहरण व संवितरण अधिकारी यांनी मान्य केलेल्या यादीनुसार, सदर प्रणालीद्वारे प्रथम देयक सादर करणाऱ्यास प्रथम प्राधान्य (First come First Serve) या तत्वावर संबंधितांच्या खात्यात ही रक्कम ICICI बँकेमार्फत जमा केली जाईल. कंत्राटदारास देय होणाऱ्या एकूण देयकाच्या रकमेतील वजातीची रक्कम संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या खात्यात जमा केली जाईल. त्यांनी वजातीची सदर रक्कम संबंधित शासकीय खात्यात जमा करावी.

**०५.** संबंधित कंत्राटदारांना एकूण निविदा किंमतीच्या जास्तीत जास्त ४ टप्प्यांमध्ये संबंधित कामाचे देयक अदा करण्यात येईल. त्यानंतर सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल व संबंधीत विभागीय आयुक्त यांना पाठवून त्याची प्रत या विभागाकडे पाठविण्याची जबाबदारी संबंधीत मुख्य वित्त व लेखा अधिकारी, जिल्हा परिषद यांची व बांधकाम पूर्णत्वाचा दाखला या विभागाकडे पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९१११८१४४८०६२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Madhukar Kide

Digitally signed by Pravin Madhukar Kide
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=859f23258c70b8895e820d29cbb58add29fb9faa98eb94efdf34e1ee1a717e23, cn=Pravin Madhukar Kide
Date: 2019.11.18 15:16:42 +05'30'

**(प्र. म. किडे)**
**सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय्य सहायक, मंत्रायल, मुंबई.
३. मा. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग यांचे स्वीय्य सहायक, मंत्रायल, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.

५. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
६. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, सर्व विभाग.
७. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय,सर्व जिल्हे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व.
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
११. कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद सर्व.
१२. कक्ष अधिकारी, रोखशाखा, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व.
१४. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सर्व.
१५. वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसं-१६, अर्थसं-१७), मंत्रालय, मुंबई-३२.
१६. नियोजन विभाग, का-१४४४, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. कार्यासन क्र.वित्त-१, वित्त-७, वित्त-८ व योजना-६ ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.